GR- 20040806172910002-1201

विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या सेवानिवृत्ती उपदान/मृत्यू उपदान/निवृत्ती वेतनावर देण्यात येणा-या व्याज दरामध्ये वाढ करण्याबाबत आणि विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या कुटुंब निवृत्ती वेतनावर व्याज देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन शुध्दीपत्रक क्रमांक पीईएन १०९४/प्र.क्र.४८७/१७,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांक ७ ऑगस्ट, २०००

वाचा:- पीईएन १०९४/प्र.क्र.४८७/१७ दिनांक १८ जानेवारी, २०००

शुध्दीपत्रक:-

संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १८.१.२००० मध्ये शेवटच्या परिच्छेदातील "त्यांनी व्याज मंजुरीनंतर अशा प्रत्येक प्रकरणी शासनाची कार्योत्तर मंजुरी घ्यावी" हा मजकूर वगळण्यात यावा व त्याऐवजी "त्यांनी शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:सेनिवे १०९४/१५५/सेवा-४ दिनांक २४.४.९५ सोबत जोडलेल्या विहीत प्रपत्रातील तिमाही अहवाल शासनास पाठवावा. तसेच ज्याप्रकरणी यापूर्वी शासनाच्या मान्यतेशिवाय जिल्हा परिषदांनी व्याज मंजूर करुन प्रदान केले असेल अशा प्रकरणी जबाबदार व्यक्तिविरुध्द केलेल्या कार्यवाहीचा (व्याज वसुलीबाबतचा) अनुपालन अहवाल प्राप्त झाल्याशिवाय कार्योत्तर मंजूरी देऊ नये." असे वाचावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वि. ला. मोई)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
वित्त विभाग (सेवा-७/४) मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
निवड नस्ती कार्यासन क्रमांक १७